**राष्ट्रीय उच्चतर शिक्षा अभियान (RUSA) या योजनेअंतर्गत केद्र शासनाने उपलब्ध करून दिलेल्या Preparatory Grants ची रक्कम संयुक्त खात्यात जमा करण्याबाबत...**

**महाराष्ट्र शासन**

**उच्च व तंत्र शिक्षण विभाग**

**शासन निर्णय क्रमांक: रूसायो २०१५/२३२/विशि-२,**

मंत्रालय, मुंबई ४०० ०३२,

दिनांक: २७ एप्रिल, २०१७.

**वाचा :** (१) शासन परिपत्रक वित्त विभाग, क्र:अर्थस-२०१५/प्र.क्र.८५/अर्थ-३, दि.१७.०४.२०१५

(२) शासन निर्णय क्रमांक: रूसायो २०१३/प्र.क्र.४१८/विशि-३, दि.२०.०५.२०१५.

**प्रस्तावना :-**

राज्यामध्ये प्राथमिक शिक्षणाचे सबलीकरण करण्यासाठी राबविण्यात आलेल्या सर्व शिक्षा अभियान व राष्ट्रीय माध्यमिक शिक्षा अभियानाच्या यशस्वीतेमुळे उच्च शिक्षणाची गुणवत्ता व पाया यांचे सबलीकरण करण्यासाठी एकछत्री योजना अभियान स्वरुपात राबविण्याकरता केंद्र शासनाने राष्ट्रीय उच्चतर शिक्षा अभियान (RUSA) ही योजना १२ व्या व १३ व्या पंचवार्षिक योजनामध्ये राबविण्याचे ठरविले आहे. महाराष्ट्र राज्यात उच्च शिक्षणात गुणवत्ता सर्वदूर संधी, समानता यासाठी केंद्र शासनाने तयार केलेल्या राष्ट्रीय उच्चतर शिक्षा अभियानाच्या अंमलबजावणीबाबत दि.२१.०४.२०१५ रोजी मंत्रीमंडळाच्या बैठकीत निर्णय घेण्यात आलेला आहे. राज्य मंत्रीमंडळाने घेतलेल्या निर्णयाच्या अनुषंगाने ही योजना राज्यात प्रभावीपणे राबविण्यासाठी राज्य प्रकल्प संचालनालयाची स्थापना करण्यात आलेली आहे.या योजनेअंतर्गत अकृषी विद्यापीठे व शासकीय संस्था यांना अनुदान वितरीत करण्याचे केंद्र व राज्याचे प्रमाण ६०:४० असे ठरविण्यात आलेले आहे. राज्य प्रकल्प संचालनालयासाठी केद्र शासनाकडून प्राप्त झालेली Preparatory Grants रक्कम राज्य प्रकल्प संचालक, उच्चतर शिक्षा अभियान यांच्या खात्यामध्ये जमा करण्यास शासनाच्या विचाराधीन होते.

**शासन निर्णय** :

राष्ट्रीय उच्चतर शिक्षा अभियान अंतर्गत मानव संसाधन विकास मंत्रालय,नवी दिल्ली यांनी राज्य प्रकल्प संचालनालयाची स्थापना करण्यासाठी केंद्र हिस्सा रू.२,७५,०५,०००/- (Preparatory Grants) इतका निधी राज्य प्रकल्प संचालक, उच्चतर शिक्षा अभियान यांच्या खात्यामध्ये जमा करण्यास शासनाची मान्यता देण्यात येत आहे.

२. सद्यस्थितीत राज्य प्रकल्प संचालनाल नियंत्रक अधिकारी म्हणून राज्य प्रकल्प संचालक, RUSA यांना व राज्य प्रकल्प सहसंचालक यांना आहरण व संवितरण अधिकारी म्हणून घोषित करण्यात येत आहे. त्याअनुषंगाने आवश्यक ती कार्यवाही नियंत्रक अधिकारी व आहरण व संवितरण अधिकारी यांनी करावी.

वरील अनुदानाची सर्व कागदपत्रे व हिशोब महालेखापाल, महाराष्ट्र-१ किंवा प्रकरणपरत्वे महालेखापाल-२ नागपूर यांनी सदर कामाकरीता प्राधिकृत केलेले अधिकारी यांना तपासण्याचे अधिकार असून, त्यांनी मागणी केल्यास, सर्व कागदपत्रे त्यांच्याकडे तपासणी करीता राज्य प्रकल्प संचालनालयाने सादर केली पाहिजेत. राज्य प्रकल्प संचालनालयास केंद्र शासनाने ज्या प्रयोजनार्थ निधी मंजुर केलेला आहे त्या निधीचा वापर त्या प्रयोजनासाठी करावा. तसेच खरेदी करताना वित्तीय अधिकार नियम पुस्तिकेतील तरतुदी तसेच संदर्भ क्र.१ मधील परिशिष्ट ९ मध्ये अंतर्भूत केलेल्या व शासनाने वेळोवेळी निर्गमित केलेल्या आदेशातील अटीचे ततोतंत पालन करावे व खरेदी प्रक्रियेच्या प्रचलित शासनाच्या नियम व अटी, शर्ती विचारात घेऊन खरेदी करण्यात यावी. तसेच विहीत कालावधीमध्ये सदरचा खर्च पूर्णपणे करण्यात येईल याची दक्षता घेण्यात यावी आणि त्याबाबतचे विनियोग प्रमाणपत्र (Utilization Certificate) शासनास विहित वेळेत सादर करण्यात यावे.

३. सदर खर्च "मागणी क्रमांक - डब्ल्यु-२, प्रधानशिर्ष- २२०२- सर्वसाधारण शिक्षण, ०३- विद्यापीठीय व उच्च शिक्षण, १०२- विद्यापीठांना सहाय्य, - (०७) (०१) व (०२) राष्ट्रीय उच्चतर शिक्षा अभियान अंतर्गत शासकीय संस्थांना सहायक अनुदान (६०% केंद्र हिस्सा) (२२०२ आय २६३), ३१ सहाय्यक अनुदाने या लेखाशिर्षाखाली सन २०१६-२०१७ मधील मंजूर तरतुदीतून खर्ची टाकण्यात यावा.

४. हा शासन निर्णय, नियोजन विभागाच्या अनौपचारीक संदर्भ क्रमांक २९४/१४७१, दिनांक २२.०९.२०१५ तसेच वित्त विभागाच्या अनौपचारीक संदर्भ क्रमांक २०३/अर्थोपाय दिनांक १८.०४.२०१७ अन्वये दिलेल्या सहमतीने निर्गमित करण्यात येत आहे.

सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेतांक २०१७०४२७१६५९१३४८०८ असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने,

Siddharth Kharat

Digitally signed by Siddharth Kharat
DN: c=IN, o=Government Of Maharashtra, ou=Higher And Technical Education Department, postalCode=400032, st=Maharashtra, 2.5.4.20=6f8cb55012423727bece629d954713c1ec2962a9ca9b909643170e56321cfd24, cn=Siddharth Kharat
Date: 2017.04.27 17:35:41 +05'30'

**( सिध्दार्थ खरात )**
**सह सचिव, महाराष्ट्र शासन**

**प्रत :**

१) मा. राज्यपाल तथा कुलपती यांचे उप सचिव, राजभवन, मलबार हील, मुंबई,
२) प्रकल्प संचालक, राष्ट्रीय उच्चतर शिक्षा अभियान,महाराष्ट्र राज्य.
३) संचालक उच्च शिक्षण महाराष्ट्र राज्य पुणे (५ प्रती)
४) कुलसचिव,सर्व अकृषि विद्यापीठे
५) महालेखापाल, (लेखा व अनुज्ञेयता), महाराष्ट्र-२, नागपूर,

६) महालेखापाल, (लेखा परीक्षण), महाराष्ट्र-२, नागपूर,
७) विभागीय सहसंचालक, उच्च शिक्षण, मुंबई
८) जिल्हा कोषागार अधिकारी, मुंबई / पुणे
९) नियोजन विभाग (कार्यासन १४७१) मंत्रालय मुंबई.
१०) वित्त विभाग (कार्यासन व्यय-५/कार्यासन अर्थोपाय) मंत्रालय मुंबई.
११) मा.मंत्री ,(उच्च व तंत्र शिक्षण), यांचे स्वीय सहाय्यक, मंत्रालय, मुंबई
१२) मा.राज्य मंत्री ,(उच्च व तंत्र शिक्षण), यांचे स्वीय सहाय्यक, मंत्रालय, मुंबई
१३) मा. प्रधान सचिव,उच्च व तंत्र शिक्षण विभाग, यांचे स्वीय सहाय्यक, मंत्रालय, मुंबई
१४) उप सचिव (विशि), उच्च व तंत्र शिक्षण यांचे स्वीय सहाय्यक, मंत्रालय, मुंबई
१५) कार्यासन अधिकारी (साशि १) उच्च व तंत्र शिक्षण विभाग, मंत्रालय, मुंबई
१६) निवड नस्ती (विशि-२), उच्च व तंत्र शिक्षण विभाग, मंत्रालय, मुंबई.